(६।४।२४), १४ वितुर्नं पुत्रः (६।११३४), १५ सनो वाजेषु (६।४।३), १६ गावो न यूथं (६।४।६), १७ पवस्वसोममदयन् (७।२।१६) द्यातील ऋचा, २० परिसुवान चक्षसे (७।५।१२), २१ नृभिर्ये मा नः (७।५।१५), २२ प्रत्यनमर्म्मनयन् (८।८।१५) (प्रतीकांच्या समोर दिलेले जे क्रमानें अष्टक, अध्याय व वर्गसूचक समजावेत.) याप्रमाणें द्विपदा व एकपदा मिळून बावीस त्यांपैकीं द्विपदा १७ व एकपदा ५ आहेत.

भाष्यः—हवनाध्ययने विपरीता सा नैमित्तिक द्विपदा। ता आह वर्गरूपेण। पश्वानतायुं दश, रयिर्नदश, वनेषु दश, श्रीणन् दश, शुक्रः शुशुक्वां दश, वनेमपूर्वी दश, अग्नेत्वमश्चत्वारि, अग्ने भव षट्, प्रशुकैतु दश, राजा राष्ट्राणा दश, कई व्यक्ता दश, वभ्रुरेको दश, परिप्रधन्वे दश, तं ते सोतारो द्वादश, इमानुकम् चत्वारि, आयाहि वनसा चत्वारि इति नैमित्तिकद्विपदा चत्वारिंशोत्तरशतमिति। हवने एकैका अध्ययने द्वे द्वे। आसामन्त्या एका उर्वरिता सा नित्यद्विपदा। उक्तं च परिभाषायां "विंशिका द्विपदा विराजस्तद्-र्धमेकपदा। द्विर्द्विपदास्त्वृचः समामनन्ति। अयुङ्वन्त्या द्विपदव (परिभाषाखण्ड १२) इति। यस्य सूक्तस्य द्विर्द्विपदाः समामनन्ति तास्त्वृचः अध्ययने चतुष्पदा कृत्वेत्यर्थः। 'अयुङ्वन्त्या द्विपदैव' सूक्तस्य ऋचो युजो या न भवन्ति तास्वन्त्या नित्य द्विपदैव। एवं अध्ययने द्वावर्धर्चऋगेव प्राधान्यम्॥

---

भाष्यार्थ.—हवन व अध्ययन या दोन क्रियांत विपरीत म्हणजे वेगवेगळ्या रीतीनें म्हणण्यांत येत ती नैमित्तिकद्विपदा होय. त्या वर्गरूपानें सांगतो. पश्वानतायु १० (११५।१), रयिर्न, १० (११५।१०), वनेषु १० (११५।११), श्रीणन् १०(११५।१२),शुक्र शुशुक्वा १०(११०।१३), वनेम-पूर्वी १०(११५।१४), अग्ने त्वम ४(४।११।१६), अग्नेभव ६(५।२।२३),

प्रश्नकेतु १० (५।३।२९), राजा राष्ट्राणां १० (५।३।२६), कई व्यक्ता १० (५।४।२३), अन्तरेषां १० (६।२।३६), परि प्रधन्व १० (७।०।२०), स तेसोतारा १२, (७।५।२१), इमानुकं ४ (८।०।२५), आपाहि वनस्य ४ (८।८।३०), याप्रमाणें नैमित्तिक द्विपदा १४० आहेत या नैमित्तिक द्विपदांची व्यवस्था अशी आहे हवनक्रियेंत एक द्विपदा म्हणावयाची व अध्ययनात (चर्चेत) दोन म्हणावयाच्या शेवटा वर्गात एकच शिल्लक राहिल्यास ती नित्यद्विपदा समजावी उदाहरण (प्रथमाष्टकातील 'प्रमन्महे' या पाचव्या अध्यायात ५ व्या वर्गापासून १४ व्या वर्गाच्या शेवटापर्यंत ज्या नैमित्तिक द्विपदा आहेत त्यांची प्रारंभापासून दोन दोन याप्रमाणें गणना करता करता शेवटी "साधुर्नगृध्नु" ही एकच अर्धर्चा शिल्लक उरते, ती नित्यद्विपदाच होय. तिचा नामनिर्देश नित्यद्विपदेंत केला आहे (पृ २३ पहा) कारण परिभाषाखण्ड ३२ यात २० अक्षरांची द्विपदा त्याच्या अर्धी म्हणजे १० अक्षरांचा एकपदा अध्ययनात दोन द्विपदांची ऋचा मानतात त्या ऋचा अध्ययनात दोन द्विपदचे चार चरण करून धाकवें हा तात्पर्यार्थ आता ज्या सूक्ताच्या ऋचा समसंख्याक नसतात त्यात शेवटीं जा उर्वरित राहील ती नित्यद्विपदा होय अशा रीतीनें अध्ययनात दोन अर्धर्चांनी एक ऋचा करून म्हणणेंच योग्य आहे

---

भाष्यः— त्रीण्यर्धर्चायाः कथम्? तत्रापि द्वावर्धर्चावेका ऋचा। अर्धर्चा एका कर्तव्या। अध्ययनसंप्रदायबलात्।' अनादेशे ऽष्टाक्षरा पादाश्चतुष्पदाऋर्च" (परिभाषा खण्ड ३) इति परिभाषायाम्। अध्ययने त्रीण्यर्धर्चे ऋक् एव सप्रदायो नास्ति। आसा परिमाणमाह। अग्नि होतारं पञ्च, सहि शर्धो न षट्, अयजायत पञ्च, विश्वो-विहायास्तिस्र. परत रथ पञ्च, प्रतद्वोचेय षट्, एन्द्रयाहुपन पञ्च-इमान्तेषाचं चत्वारि, सनोनव्येभिर्वर्ज्यम्। इदाय हि द्यौ सत, त्वया-

वर्धं पट्, जनर्मह एका, वनोति हि एका, आत्वाजुवो पट्, स्तीर्णं पञ्च, इमे वां सोमा एका, इमे ये ते सुतायो वा एका, प्रसुज्येष्ठं पट्, ऊती-देवानां षड्वर्ज्यम्। सुषुमायातं त्रीणि, प्रप्रपूष्णश्चतुष्कं, अस्तु श्रौपट् चत्वारि, दार्वीभिर्नः षड्वर्ज्यम्। त्रृपचिद् पञ्च, ये देवासो षड्वर्ज्यम्। नवत्य-र्धर्चमेका, सखेसखायमेका, अयारुचा त्रीणि, एतास्त्रीणित्रीण्यर्धर्चा ऋचा, इयत्तीयाश्चतुर्नवतिसंख्या इति। त्रीण्यर्धर्चं ऋकद्वयने। अध्ययने अर्धर्चद्वयेन ऋक् एका। अर्धर्चैनैकेषं ऋक्द्वये कर्तव्य इत्यर्थ.।

---

भाष्यार्थः—जेथें एका ऋचेंत तीन अर्धर्चा आहेत तेथें अध्ययन व हवनक्रियेसाठीं काय योजना करावी ? असा प्रश्न उपस्थित झाला तर त्याची व्यवस्था अशी : परिभाषेंत ' अनादेशेऽष्टाक्षरा पादाश्चतुष्पदाश्चर्चः' असा नियम आहे. याचा अर्थ जेथें अमुक अक्षराचा चरण असा उल्लेख नाहीं, तेथें आठ अक्षराचा चरण व चार चरणाची एक ऋचा समजून अध्ययन करावें असा अध्ययनसंप्रदाय रूढ असल्यामुळें अध्ययनांत तीन अर्धर्चाची एक ऋचा म्हणण्याचा संप्रदाय कोठेंही नाहीं आता तीन अर्धर्चांची मिळून एक ऋचा ( सतपदा ) अशा ज्या ऋचा संहितेंत आल्या आहेत त्याची संख्या सांगतो. अग्निहोतारं ७ ( २।१।१२ ), सहियघोन ६ ( २।१।१३ ), अय जायत ५ ( २।१।१४ ), विश्वो-विहाया ३ ( २।१।१५ ), यं त्वं रथ ५ ( २।१।१६ ), प्रतद्वोचेयं ६ ( २।१।१७ ), एन्द्र या ह्युपनः ८ ( २।१।१८ ), इमान्तेवाजं ४ ( २।१।१९ ),(सनोनव्येभि ऋचा सोडून ) इंद्रायहिद्यौः ७ ( २।१।२० ), त्वया वयं ६ ( २।१।२१ ), जनर्मह १ ( २।१।२२ ), वनोति १ ( २।१।२२ ), आत्वाजुवः ६ ( २।१।२३ ), स्तीर्णे ५ ( २।१।२४ ), इमे वां सोमा १ ( २।१।२५ ), इमे येते सुतासो १ ( २।१।२५ ); प्रसुज्येष्ठं ६ ( २।१।२६ ), (ऊतीदेवानां ऋचा सोडून ) सुषुमायातं ३ ( २।२।१ ), प्रप्रपूष्णः ४ ( २।२।१ ), अस्तु श्रौपट् ४ ( २।२।१ ),

शर्चाभिर्नो ऋचा सोझ्न,) वृषन्निद्र ५ ( २।१।४ ) (ये देवासो ही ऋचा ाइन,) ततस्वस्यं १ ( २।६।२८ ), सखे सख्यायम् १ ( ३।४।१२ ), नयारुचा ३ ( ७।५।२३ ) ह्या तीन तीन अर्धर्चांची एक ऋचा ( म्ह. तसपदा ) अशा ऋचांची संख्या हवनक्रियेंत १४ आहे; अध्ययनक्रियेंत मात्र दोन अर्धर्चांची एक ऋचा व एक अर्धर्चेची एक ऋचा अशा दोन समजाव्या. ( प्रत्येक प्रतीकांतील अंक क्रमानें अष्टक, अध्याय व वर्ग यांचे बोधक समजावे. )

भाष्यः—एकर्चस्य ऋग्द्वयं विराट्छंदो विना कथं भवति ? इत्याशङ्क्य उच्यते। विराट्छंदः सर्वच्छंदसि व्याप्तं वर्तते। उक्तं चारण्यके 'चत्वारः पुरुषा इति बाध्वः। शरीरपुरुषः, छंदःपुरुषो, वेदपुरुषो, महापुरुष इति (ऐ. आर. ३ अ. २ खं. १) तस्योष्णिक्लोमानि त्वग्गायत्रीत्रिष्टुब्मांसमनुष्टुप् स्नावान्यस्थिजगतीपंक्तिर्मज्जा प्राणो बृहती (ऐ. आ. २, खंड ६) इति योऽयेतानि विराट्चतुर्थान्येवमुहैवैवं विदुष एतद्दहः सर्वैश्छंदोभिः प्रतिपन्नं भवति। ( ऐ. आ.१ खण्ड १२)इति प्राप्तिः भवतीत्यर्थः। गायत्रीश्च पंक्तीश्च व्यतिषजति गायत्रो वै पुरुषः पांक्ताः पशवः इति ब्राह्मणम्। अत्रोदाहरणम् "पचस्वसोमस्तिस्रो नित्यद्विपदा गायत्र्य इति सर्वानुक्रमण्यां " द्विपाद् वै पुरुषो वीर्यं त्रिष्टुप् विराड्भ्यामनयोद्वाविंदयोर्द्विपदयोरयं पुरुषः" अत्रोदाहरणानि-श्रावांसूक्ते. ( ५।१।१४,) प्रत्यस्मैकर्मन-यन्(८।८। १५,)परिसुवानश्चक्षसे(७।५।१२) जगतीपादः इति। एवं सर्वव्याप्तो भवति इत्यर्थः- "छंदांसि जज्ञिरे" इति श्रुतिः। तथा च शतपथब्राह्मणे-किं छंदः। का देवता प्रतिष्ठे इति। द्विपदा छंदः, विष्णुर्देवता प्रतिष्ठे इति। यथा विष्णुः सर्वव्यापस्तथा विराट्छंद इत्यर्थः।

---

भाष्यार्थः—एका ऋचेच्या दोन ऋचा विराट्छंदावांचून कशा

---

टीप.—१ विराट्छंदश्चतुःसंख्यापूरक । येषां गायत्री त्रिष्टुप्

होतील ? अशी शंका घेऊन त्याविषयींचा परिहार सांगतात 'विराट्छंद सर्व छंदात व्यापून आहे' ऐतरेयआरण्यकप्रथान १ शरीरपुरुष, २. छंद पुरुष, ३. वेदपुरुष व ४ महापुरुष असे एकूण चार पुरुष आहेत अश बाध्याचें मत दिले आहे छंदपुरुषाचें वर्णन श्रुतीनें असें केलें आहे की, उष्णिक् हे त्याचे लोम (अंगावरील बारीक केस), त्वचा गायत्री, मांस त्रिष्टुप्, स्नायु अनुष्टुप् अस्थि जगती, मज्जा पंक्ति व बृहती प्राण हे सर्व छंद विराट् त्वचेच आहेत असें जाणणा-यास सर्व छंदात विराट्छंद व्याप्त आहे असें समजून येतें. असे गायत्रीछंद पंक्तिछंदात ऐक्य पावतो, कारण "गायत्री पुरुष पाक्ता पक्षत" असा ब्राह्मण आहे विराट्छंद गायत्रीछंदात व्याप्त आहे, याचे उद. पवस्वसोममदयन्. या तीन ऋचा गायत्रीछंदाच्या असून विराट् छंदाच्याही आहेत असें सर्वानुक्रमणात सांगितलें आहे द्विपद् हा पुरुष, दीर्घ हें त्रिष्टुप् म्हणून त्रिष्टुप् व विराट या दोन छंदाच्या ठायीं द्विपदेचा हा पुरुष आहे. विराटछंदात दुसरे छंद व्याप्त आहेत याचीं उदा० 'आवा सुम्ने', 'प्रत्यर्चनर्कमनयन्' या दोन द्विपदामध्ये त्रिष्टुप् छंदाचा पाद असून विराट्छंदही आहे. 'परिसुताश्चक्षसे' या द्विपदेत विराट्छंद असून जगतीछंदाचा पाद आहे तात्पर्य, या उदाहरणांनी विराट्छंद सर्व छंदात व्याप्त आहे असें सिद्ध होतें त्याप्रमाणें शतपथ ब्राह्मणातही "किं छंद का देवता" छंद कोणता, देवता कोणती असा प्रश्न उपस्थित करून द्विपद छंद, विष्णुदेवता असें उत्तर दिलें आहे त्यावरून विष्णु जसा सर्वत्र व्याप्त आहे तसा विराट्छंद सर्व छंदात व्याप्त आहे असें समजाव

---

जगतीना, तानि विराट् चतुर्योनीदशानि यान्येतानि चत्वारि सन्ति तान्ये तान्येव सकलान्येतानिरूप छंदो रूपाणि गायत्र्यादीना स्तम्न निष्पादकदेहत्वेन मुख्यत्वात् छंदो रूपत्वोपचार । एवमुक्तेन यथोक्त प्रकारेण गायत्र्यादीना त्रयाणां अंतर्भावो विराट् छंदिताना चतुर्णां सर्वछंदोरूपत्वोपचार ।

भाष्य:— विराट्छंदस्तु चतुष्पदा । त्रीण्यर्धर्चानां पञ्चपदा ऋक् कर्तव्येति किं प्रमाणं । तत्रोच्यते-एकपाद्भूयो द्विपदो विचक्रमे, द्विपाद्त्रिपादमभ्येति पश्चात् । चतुष्पादोने द्विपदामभिस्वरे संपश्यन् पंक्तीरुपतिष्ठमानः ॥ ( अष्ट. ८ अ.६ व. २३ ) एकपदा द्विपदा नित्या । द्विपाद् त्रिपादमभ्येति । एकीभूता भवतीत्यर्थः । अस्योदाहरणम् । अग्निहोतारं मन्ये० दसम् । यऊर्ध्वया० कृपा ( अ. २ अ.१ व १२ ) अग्ने अर्धर्चा घृतस्य विभ्राष्टिमनुवष्टि०सर्पिषः ( अ. २ अ. १ व. १४ ) इति द्विपदा । ( चतुष्पदा तु ' पश्वानतायुम् ' (१।५।१) । एकार्धर्चा त्रिपदा, एकार्धर्चा द्विपदा एका ऋक् पञ्चपदा अध्ययते । द्विर्द्विपदास्त्वृचः समामनन्ति, इत्यत्र समपादग्रहणात् । असमानपादा विरुद्धा तर्हि पंक्तिच्छंदो पञ्चपदा भवति । तस्य द्वितीयभेदो विराट् तस्मात् पञ्चपादत्वं प्राप्तम् । समपादो वा असमपादो वा विराट् छंद इत्यर्थः । अत्र श्रुतिः ॥ समौचिद्धस्तौ न समं विविष्टः, सम्मातराचिन्नसमं दुहाते ॥ ( ८।६।२३ ) इत्यनया ऋचा परिहारः । दक्षिणवामहस्तौ समौ कर्तृत्वेऽसमौ इत्यर्थः ॥

---

भाष्यार्थ:— विराट्छंद चार चरणाचा आहे. मग तीन अर्धर्चांच्या पाच चरणांची ऋचा करावी, याविषयीं प्रमाण काय ? असें म्हणाल तर सांगतो. आलेला ' एकपाद्भूयो० ' हा मंत्र प्रमाण आहे. या मंत्राचा अर्थ:- एक चरणाची द्विपदा नित्य असते. दोन चरणाची अर्धर्च तीन चरणाच्या अर्धर्चीत ऐक्य पावते. उदाहरण ' अग्निहोतार ' या अर्धर्चीचे तीन चरण व तिच्यापुढें असलेल्या ' यऊर्ध्वया ' या अर्धर्चीचे दोन चरण एकत्र होऊन पांच चरणांची एक ऋचा व त्यापुढें ' घृतविभ्राष्टि ' ही अर्धर्च दोन चरणाची आहे. यामध्ये पाच चरणाची एक ऋचा अध्ययनासाठीं समजावी. मुळात ' पश्वानतायुं ' (१।५।१) ही नैमित्तिक द्विपदा आहे; परंतु अध्ययनार्थ तिचे चारच चरण करावे. कारण " द्विर्द्विपदास्त्वृचः समामनन्ति " या परिभाषेव-

अध्ययनासाठी समपाद मन्त्रग्रहण आहे पंक्तिछंद पाच चरणाचा असल्यानें असमपाद होतो हा गोष्ट अध्ययननियमाला विरुद्ध दिसते अशी शंका येईल, तर पंक्तिछंदाचा दुसरा भेद विराट् आहे, म्हणून त्याला पंचपादत्व येत नाही. विराटछंद समपाद व असमपादही असतो. आता अध्ययनविधींत येणाऱ्या दोषाचा परिहार "समौचिद्धस्तौ" या श्रुतीने होतो. त्या श्रुतीचा अर्थ—दोन हात सारखेच असतात पण त्याच कर्तृत्व सारखें असत नाहीं. एका गाईच्या पोटीं दोन कालवडी जन्मपावतात, पण दूध सारखें देत नाहीत. व्यवहारातीत उदाहरणें —दोन जुळी मुलं सारख्या न्यायाची नसतात किंवा दोन जवळचे नातेवाईक सारखें दान देत नाहीत.

---

भाष्यः —अथाध्ययने मन्त्रसंख्योच्यते। पञ्चसप्त्यधिकचतुः शतदशसहस्राणि (१०४७६)। ता नैमित्तिकदिवाश्यावादिद्वाद्वशशतसहिता षट्पञ्चाधिकपञ्चशतदशसहस्राणीति (१०५६६) "संज्ञानमुशनावदत्" सूक्तस्य पञ्चदशर्चैकीकृत्य (१०५८१) एव पारायणे क्रमसंख्या। "ऋचा दशसहस्राणि" इति वचनस्य पूर्णा भवति इत्यर्थः। एका उर्वरिता सा 'भद्रं नो अपि वातय मनः' (७।७।२) इति पादाधिक्यमनुक्रमणिकावृत्तावप्युक्तं। भद्रं पुरुडमित्यारण्यके (ऐ आ ५।८)। (संज्ञानसूक्तपरिशिष्टे पृथक् दत्तम्)। तत्पञ्चदशर्चात्मकम् अस्य ग्रहणे प्रमाणं आश्वलायनगृह्य सूत्रम् तच्च "समानीव इत्येका तच्छंयोरावृणीमह इत्येकेति"। तथा सांख्यायनस्य कौषीतकिसूत्रम्। अथोपाकरणोत्सर्जनयोः प्राङ्मावे हस्तेन श्रवणेन वाऽक्षतसक्तून् धानाना च दधिघृतमिश्राणां प्रयुच चदेन जुहुयात् इति हैक आहुः सूक्तानुवाकाद्यामिरिति याऽऽद्यायादै याद्याभिरिति माण्डूकयोन इ स्माह कौषीतकीराग्निमीळे पुरोहितमित्येका कुमुमकस्तदग्नयोद्याद्वदस्य शकुने भद्रमावद, गृणानाजमदग्निना, धामन्ते विश्वं भुवनमाधिश्रित, गन्तानो यज्ञं यज्ञिया सुशमि,

योनः स्वो अरणः, प्रतिचक्ष्वविचक्ष्वाग्नेयाहि मरुत्सखा यज्ञे राजन् घृतं हविरिति द्वृचा तच्छंयोरावृणीमह इत्येका हुतशेषा दधिः प्राश्नन्ति (कौ सू. ४ अ ५ खण्ड) इति । पञ्चशाखाना पारायणे तच्छंयोरावृणीमहे, इत्यत्र समाप्तिरेकवेदत्वात् । उक्तं च – ऋचा समूह ऋग्वेदस्तमभ्यस्य प्रयत्नत । पठित॰ शाकलेनादौ चतुर्भिस्तदनन्तरम् ॥ १ ॥ शांख्याश्वलायनौ चैव माण्डूका बाष्कलास्तथा । बह्वृचा ऋषय॰ सर्वे पञ्चैते एकवेदिन ॥ इति । शांख्या नाम शांखायन इति ॥

---

भावार्थ — आता अध्ययनाविषयी क्रमवार सांगतो १०४९६ ऋचा ह्या नैमित्तिक द्विपदा १४० (दोन द्विपदेची एक ऋचा याप्रमाणे ७०) आणि संज्ञानसूक्त १५ ऋचा मिळून (१०४९६ + ७० + १५) १०५८१ ही पारायणाची क्रमसंख्या 'ऋचा दशसहस्राणि' या कारिकेंत दिल्याप्रमाणे पूर्ण होते उर्वरित ऋचा म्ह 'एकपाद' भद्रं नो अपि वातय मन ' हा अधिक धरण्यासाठी सर्वानुक्रमणीच्या वृत्तींत सांगितले आहे. त्याविषयी 'भद्र पुच्छ' ऐतरेयारण्यक पाचवे खण्ड ८ मध्येही प्रमाण आहे संज्ञानसूक्ताच्या १५ ऋचा आहेत त्या परिशिष्ट १ मध्ये दिल्या आहेत त्या पारायणात घेण्याविषयी, आश्वलायनगृह्यसूत्रात प्रमाण आहे ते असे – उपाकर्मात हवनासाठी समाप्तीची ऋचा म्हणून समानीव ही एक व 'तच्छंयोरा' ही एक घ्यावी त्याचप्रमाणे शांखायनगृह्य कौषीतकी गृह्यसूत्रातही आहे हे असे—औषधी उगवल्यावर, हस्त किंवा श्रवणनक्षत्रावर उपाकर्म करावे त्यामध्ये अक्षतैस्तु किंवा धाना हे दही आणि तूप यात मिसळून वेद मंत्राने प्रतिकर्मेण हवन करावे हवनाकरिता सव स्वाध्यायाने त सूक्त, अध्याय, अनुवाक किंवा खण्ड यानी पाहिजे ऋचा घ्यावी, पण मात्र

---

१ शाकला  २ अव  ३ ढी

केय सांगतो शैशीतरीच्या मतें 'अग्निमीळे' ही एक 'कुसुभकस्तदब्रवीत्०' आवदरून म्हणजे भद्र०, 'गणाना जमदग्निना० ' 'धामन्ते विश्व भुवन० ' 'गन्तानो यज्ञ०', 'यान स्तो अरण०' 'प्रतिचक्ष्वविचक्ष्व०', 'आग्ने याहि०', 'यत्ते राजन्०' ह्या दहा दोन ऋचा व शाखा 'तच्छंयोरा वृणीमहे' ही एकूण ऋचाना होन करावा नंतर दिल्हेंक उग्लेला हविभाग करिज सांगतात. सांपर, ऋग्वदी पाचही शाखांच्या पारायणात 'तच्छं योरावृणीमहे' या ऋचनेच समाप्ति व्हावी असें सांगितलें आहे ऋचाचा समुदाय म्हणजेच ऋग्वेद त्याचा प्रथम प्रयत्नानें शाकल नामक ऋषीनें अभ्यास केला, नंतर चार शाखाच्या लोकांना केला सांख्य (शांखायन) आश्वलायन, माडूकेय, बाष्कल व बव्हृच (शाकल) हे पाच ऋषि एक वेदीच आहेत (वर्गमणनाबोधक श्लोकांचीं प्रतीकें भाष्यांत आहेत)

---

भाष्यः—अथ पारायणे वर्गसंख्योच्यते-'एकर्चं एकवर्गश्च एकश्च नवकस्तथा'। एकर्चं एकवर्गो "जातवेदसे" नवर्चं एक- वर्गः 'अपोहिष्ठा इति'। 'द्वौ वर्गौ तु द्व्यृचौ ज्ञेयौ' द्वौ वर्गौ द्व्यृचावित्यर्थ 'अग्ने त्वन्नो अन्तमः' (अष्ट० ४ अ० १ वर्ग १६) 'आयाहि वनसा सह' (अष्ट० ८ अ० ८ व ३०) इति। 'त्र्यृच- वर्गस्य शतं स्मृतं तृचोवर्गाः शतमित्यर्थः। "उतत्यचमसंनव- मित्यादि"। "चतुर्ऋचा पञ्चसप्तत्यधिकं च शतं तथा" चतुर्ऋच वर्गा पञ्चसप्तत्यधिक शतमित्यर्थः। 'यदङ्गदाशुषेत्यम्"इत्यादि। "पञ्चर्चं तु द्विशतकं सहस्र रुद्रसयुतम्" पञ्चर्च वर्गा एका- दशाधिक द्वादशशतानीत्यर्थ। 'अग्निमीळे' इत्यादि। 'पञ्च- सत्यार्थाधिकं तु षड्ऋचा तु शतत्रयम्"। षड्चवर्गाः पञ्चत्या- रिंशदाधिकशतत्रयमित्यर्थः। 'अश्विना यज्वरी रिष इत्यादि। सप्तऋचा शतं प्रोक्तं विंशतिश्चाधिका स्मृता"। सप्तर्चवर्गा विंशत्य- धिकशतमित्यर्थ। 'यच्चिद्धि सत्यसोमपा' इत्यादि। "अष्टर्चां तु पञ्चाशत्पञ्चाधिकास्तथैव च"। अष्टर्चवर्गा पञ्च पञ्चाशदित्यर्थ।

इन्द्रं विश्वा अवीवृधन् इत्यादि। एवं दशाधिकमहस्रद्वयवर्गाः। पञ्चशाखासु निश्चिताः "। पञ्चशाखानां पारायणे निश्चये-त्यर्थः। "वर्गाः संज्ञानसूक्तस्य चत्वारश्चात्रमीलिताः"। संज्ञानसूक्तस्य चत्वारो वर्गाश्चात्रमिलित्वा दशाधिकसहस्रद्वयमित्यर्थः। 'एवं पारायणे प्रोक्ता ऋचां संख्ये न न्यूनतः" एवं पूर्वोक्तप्रकारेण, वर्गस्य ऋक् न्यूनसंख्येन, दशर्चस्य पञ्चऋक् त्र्यापयर्धर्चस्य, ऋक् कर्तव्येत्यर्थः। एवं चतुर्विधपारायणेऽपि ज्ञेयम्।

---

भाष्यार्थः—एक ऋचेचा एक वर्ग "जातवेदसे". दोन ऋचांचे दोन वर्ग 'अग्ने त्वन्न' आणि 'आयाहि वनसा'. तीन ऋचांचे शंभर, 'उतत्यं चमसं नवं' इ. चार ऋचांचे १७५ 'यदंगदाशुषे त्वं' इ. पांच ऋचांचे १२११, 'अग्निमीळे' इ. सहा ऋचांचे ३४५, 'अश्विनाय-ज्वरीरिषः' इ. सात ऋचांचे १२०, 'यच्चिद्धिसत्यसोमपा' इ. आठ ऋचांचे ५५, 'इंद्र विश्वा अवीवृधन्' इ. नऊ ऋचांचा एक वर्ग, 'आपोहिष्ठा' असे सर्व मिळून २०१० वर्ग. पांच शाखांच्या पारायणा साठीं निश्चित वर्गसंख्या आहे. ही संख्या संज्ञानसूक्ताचे ४ वर्ग धरून आहे. शिवाय पारायणांत नैमित्तिक द्विपदा आणि सप्तपदा याचे जे वर्ग आहेत त्यांतील ऋचांची संख्या न्यून (१० ऋचांची ५, तीन अर्धर्चेची १ एक) धरून सांगितलेली आहे. तात्पर्य, ऋग्गणना करण्याचे वेळीं, नैमित्तिक द्विपदा १४०, त्यांच्या ७० ऋचा व सप्तपदा ऋचा १४ धेतल्या आहेत. अशा रीतीनें क्रमादि चार पारायणांत हीच संख्या समजावी.

---

भाष्यः— 'समानीय' इति शाकलानां 'तच्छंयोरा' इति बाष्कलानामित्यस्य, बाष्कलशाखाध्ययनमनुक्रमणिकावृत्तावुक्तम्। तत्र 'गौतमाश्वादिजः कुत्सः पारुच्छेपादेवः परः। कुत्सा दीर्घतमस्येवं बाष्कलाध्ययने क्रमः' ॥ अस्यार्थः गौतमाश्वादिजः कुत्सः 'उपप्रयन्तो' 'नासत्याभ्यां' 'मन्द्रिहोतारं' 'इमंस्तोमं'

'वेदिषदे' एष बाष्कलक्रम इत्यर्थः। अत्रैव अष्टममण्डले सूक्तनवके अनुक्रम विपर्यासः। तच्च 'स्वादोरभक्षि०' सूक्तान्ते 'अभिप्रवः सुराधसं' 'प्रभुश्रुतमिति' सूक्तद्वयं पठित्वा। 'अग्न आयाह्यग्निभि-रिति पठेत् ततः 'आमद्रव' अध्याये 'गौर्धयति' अनुवाका दश-सूक्तात्मकः शाकलस्य। पञ्चदशसूक्तात्मको बाष्कलस्य। तत्रोच्यते गौर्धयति सूक्तानन्तरं 'यथामनौ सांवरणौ' 'यथामनौ विवस्वति' 'उपमन्त्वा' 'पतत्त इंद्र' 'भूरिदिंद्रस्य' इत्यन्तानि पञ्चसूक्तानि पठित्वा, 'आत्वा गिरो रथीरिव' इति पठेयुः। अन्ते संसमित्सूक्ता-नन्तरं पञ्चदशकचात्मकं 'संज्ञानमुशनाब्रवत्' इत्यादि 'तच्छंयोरा-वृणीमहे' इत्यन्तं वेदसमाप्तिरिति बाष्कलाध्ययनम्। एवं अध्य-यनाभावात् शाखाभाव इत्यर्थ। सूक्तसहस्रसप्तदशाधिकात् अष्टौ सूक्तानि बाष्कलस्याधिकानीत्यर्थः। 'प्रतिते' 'युवं देवा' 'यमृत्विजो' 'इमानि वां' इति चतुर्णां वालखिल्य-सूक्तानां लोप इत्यर्थः। यस्मात् ऋग्वेदं चैवाप्यधीते, स नाकपृष्ठ भजते ह शश्वत्। अस्यार्थः—य तान् ऋगर्थविद् वेद ततः हवने पारायणे च अधीते, स वेदिताऽध्येता च नाकपृष्ठं शश्वत्सदा भजते ह प्रसिद्धौ। इतः अमुं लोकमेत्य, तस्मात् न प्रच्यवते हीत्यर्थः।

---

भाष्यार्थः—'समानीव' (८।८।४९) ही शाकलाना व 'तच्छंयो' ही बाष्कलाना शेवटची ऋचा सांगितली आहे. तेथेच बाष्कल शाखेचा अध्ययनक्रम सांगितला आहे, तो असा —पहिल्या मंडलातील उपप्रयन्तो, (१।६।२१) हा अनुवाक म्हणून झाल्यावर क्रमानें 'नास त्याभ्या' 'अग्निहोतर' 'इम स्तोम' 'वेदिषदे' हे अनुवाक म्हणावेत. नंतर सातव्या मंडलापर्यंत उर्वरित राहिलेले सर्व अनुवाक म्हणावे पुढें आठव्या मंडलात नवसूक्ताचा अनुक्रम बदलावा, तो असा –'स्वादोरभक्षि' हें सूक्त संपल्यानंतर 'अभिप्रव' (६।४।१४) 'प्रभुश्रुत' (६।४।१६) ही दोन सूक्तें म्हणावी नंतर अग्न आयाह्यग्नि (६।४।२१) सूक्त म्हणावें

त्यानतर ' आप्रद्रय ' (अ. ६ अ ५) अध्यायात 'गौर्धयति' हा अनुवाक् शाकलशाखीयाना १० सूक्ताचा व बाष्कलाना १५ सूक्ताचा आहे. तो कसा तें सागतों. ' गौर्धयति ' (६।६।२८) सूक्तानतर ' यथा मनौ सावरणौ ' (६।४।१८), ' यथा मनौ विवस्वति ' (६।४।२०), ' उपमन्त्वा ' (६।४।२२), 'एतत्तदन्द्र' (६।४।२४), ' भूरिदिद्रस्य ' (६।४।२६). हीं पाच सूक्तें म्हटल्यावर ' आत्वा गिरो रथीरिव ' इत्यादि सूक्तें आठव्या अष्टकातील आठव्या अध्यायात असलेल्या ' सस-मित् ' सूक्तापर्यंत गवसून ' समानसुतानावदत् ' हें यथरा ऋचाचें सूक्त म्हणावें, म्हणजे ' तच्छंयो ' ही ऋचा समाप्तीला येते हा प्रकारचा अध्ययनसप्रदाय सध्या प्रचारात नाहीं, म्हणून बाष्कलशाखेचा अभाव आहे असें लोक म्हणतात. तात्पर्य, शाकलाच्या १०१७ सूक्ताहून ८ सूक्तें बाष्कलाना अधिक आहेत व ' प्रतिते ' (६।४।२७), ' युव देवा ' (६।४।२८), ' यमृत्विजो ' (६।४।२९), 'इमानि वा' (६।४।३०) हीं चार वालखिल्यसूक्तें त्याना नाहींत, हें जाणून ऋग्वेद जाणणारा व अध्ययन करणारा जो कोणी हवन व पारायण या दोन क्रियेंत त्याचा विनियोग करतो, तो निरतर स्वर्गांतच वास करतो, म्हणजे मृत्युलोकात पुन परत येत नाहीं.

---

भाष्य:— अथ पारायणफल तदुक्त आरण्यके। " यद्धि संधिं विवर्तयति, तन्निर्भुजस्य रूपमथ, यच्छुद्धे अक्षरे अभिव्याहरति तत्प्रतृण्णस्य रूपमग्रउ उभयमन्तरेणोभय व्याप्त भवत्यन्नाद्यकामो निर्भुज ब्रूयात् । स्वर्गकाम प्रतृण्णमुभयकाम उभयमंतरेणेति " अस्यार्थः । द्वयो पदयोरक्षरयोर्वापि संधिस्तस्य भिविच्छेदाय्यनं तन्निर्भुज संहितापारायणमुच्यते । शुद्धे द्वे पदे अक्षरेवा संधिम कुर्वन्नेोच्चारणं, तत् प्रतृण्णं तत् पदपारायणम्। संहितापदा-श्यामुभाभ्यां व्याप्तमुभयमन्तरेण क्रमपारायणमित्यर्थ । तथा च

त्वाति त्रिभिः कृत्वा स्वरास्वरं विजानाति मात्रा मात्रां विभजते, सा संहितेति। एवमेतां संहितां यो वेद सधीयते, प्रजया पशुभिर्यशसा, ब्रह्मवर्चसेन स्वर्गेण लोकेन सर्वमायुरेतीति। तस्मात् क्रमादृते द्वे पदे संहिता द्वैपदस्स्वरश्च न सिध्यति। द्वैपदासिद्धे उत्तरारम्भः कर्तुं न शक्यते। अतश्च पादार्थेर्च ऋक्सूक्तसिध्यर्थ भगवता पाञ्चालेन स्थापितानां पारायणकर्मणा क्रमपारायणमुत्तमं भवति। अत्र श्लोकः— प्रागाथेन पुरा ज्ञान दृष्ट्वा बुद्धा महामुनिः। अर्थवत्तं क्रमं ब्रूयात् देवतायाश्च शास्त्रतः॥ १॥ अतो ऋग्यजुषां बृंहण, पदैः स्वरैश्चाध्ययनं तथा त्रिभिः।

अतोऽपि अस्मादपि हेतोः क्रमः अर्थवान् भवति। क्रमेण कृत्वा ऋग्वेदपारायणे, ऋचां बृंहण साधारणं भवति। इदमित्थमेव पाठ इति स्वरमात्रादिरूपेण, निश्चयो भवति। तथा यजुर्वेदपारायणे, यजुषां बृंहणं नाम साधारण स्वरमात्रादिरूपेण, इदमित्थमेव पाठ इति निश्चयो भवति इत्यतिदेशः। इत्यलं प्रपञ्चेन।

---

**भाष्यार्थ** —आता पारायणाचें फल ऐतरेयआरण्यकांत सांगितलें आहे तें असें —दोन पदांचा किंवा अक्षराचा जो संधि त्याचा विच्छेद न करता, म्हणजे आर्षीसंहितारूपानें जें पठन त्याला वैदिक ' निर्भुज ' असें म्हणतात निर्भुजपारायण म्हणजे संहितापारायण. दोन शुद्ध अक्षराचे किंवा पदाचे संधि न करतां, जें वेगवेगळालें पठन त्याला वैदिकाची ' प्रतृण्ण ' अशी संज्ञा आहे प्रतृण्णपारायण म्हणजे पदपारायण संहिता व पदें या दोहोंनीं युक्त असें जें पारायण त्यास ' उभयमन्तरेण ' असें वैदिक नांव आहे. ' उभयमन्तरेण ' पारायण म्हणजे क्रमपारायण. अन्नादिकाची म्हणजे ऐहिक फलाची इच्छा असेल, तर त्यानें ' निर्भुनपारायण ' म्हणजे संहितापारायण करावें. स्वर्गकाम पुरुषानें प्रतृण्ण म्हणजे पदपारायण व दोन्ही फलाची इच्छा असणाऱ्यानें, उभयमन्तरेण म्हणजे क्रमपारायण करावें. ऐतरेय आरण्यकांत ' तथा च सति त्रिभिः कृत्वा ...

व एवमेतां संहितां वेद' असें जें वचन आहे, त्याचा अर्थ अशा प्रकारें तीन पारायणें करून ह्या संहितेला जो जाणतो म्हणजे अध्ययन व उपासना करतो तो उपासक संतति, पशु, कीर्ति, विद्यारूप ब्रह्मतेज व स्वर्गलोक मिळवून पुरुषाचें पूर्णायुष्य (१०० वर्षें) मिळवितो. क्रमावांचून दोन पद, संहिता व दोन पदांतील स्वर ह्यांची सिद्धि होत नाहीं म्हणजे ही संहिता हा स्वर असाच आहे, असा निश्चय होत नाहीं. तात्पर्य, द्विपदाच्या असिद्धीमुळें पाद, अर्धर्च, ऋचा व सूक्त यांचें अध्ययन बरोबर होणार नाहीं आणि त्यामुळें पुढील जटादि आठ विकृतींच्या अध्ययनास आरंभ होणार नाहीं. म्हणून भगवान् बाभ्रव्यपुत्र पांचालानें सांगितलेल्या पारायणांत क्रमपारायणच उत्तम आहे. प्राणायरूपीनें पूर्वी शिष्यांना क्रमावांचून सांगितलेलें अध्ययन पाहून रागावलेल्या भगवान् पांचालानें देवता व शास्त्र यांच्या प्रसादामुळें क्रमच अर्थवान् आहे असें म्हटलें आहे. तसेंच प्रातिशाख्य पटल ११ पद्य १७ यात द्विपदांतल्या पदांनीं व स्वरांनीं ऋचांचें व यजूंचें चांगल्या रीतीनें धारण क्रमपाठानेंच होऊं शकतें असें सांगितलें आहे. त्याशिवाय संहिता, पदें व क्रम या तीन प्रकारच्या अध्ययनानें युक्त असें वेदाध्ययन सुसंपन्न होय. ह्याकरितां क्रमपठन अवश्य होय! क्रमाध्ययनाला फार महत्त्व आहे. 'नानृषिः कुरुते काव्यं नारुद्रः क्रमपाठकः' या सुभाषितांतही शिवांशाशिवाय क्रमपाठक वैदिक होत नाहीं असें म्हटलें आहे. ह्या अर्थवादवचनानेंही क्रमपाठाचें महत्त्व व्यक्त होतें. दुसरें उपोद्घातक प्रातिशाख्यवचन-पदक्रमविभागज्ञो वर्णक्रमविचक्षणः। स्वरमात्राविशेषज्ञो गच्छेदाचार्यसंपदम् ॥ अर्थः—पद व क्रम यांचा विभाग जाणणारा, वर्णक्रमाचें स्वरूप व विभाग जाणण्यांत चतुर म्हणजे उदात्तादि स्वर, ह्रस्वादिमात्रा (उच्चारणकाल) त्यांचें स्वरूप ओळखणारा वेदाभ्यासी ब्राह्मण आचार्यत्वाला प्राप्त होतो म्हणजे त्याला 'आचार्य' हें नांव शोभतें. 'संपदम्' असा पाठ घेतल्यास पूर्वोक्त ज्ञान संपादन केलेल्या

पुरुषानें आचार्यसमेत आणि एरव्हीं त्याला गुरुसमेत पठनाची योग्यता येत नाहीं.

---

**भाष्यः— अथ पारायणविधिः। अत्रादौ कलशस्थापनादि उक्तं, महार्णवे। तीर्थे देवालये गेहे प्रशस्ते सुपरिष्कृते। कलशं सुदृढं तत्र सुनिर्णिक्तं सुभूषितम् ॥ १ ॥ पुष्पपल्लवमालाभिश्चन्दनैः कुंकुमादिभिः। मृत्तिकायवसंमिश्रं वेदिमध्ये न्यसेत्ततः ॥२॥ पश्चाद्भिः कुशैः कार्यो ब्रह्मा पश्चान्मुखः स्थितः। स्नापितः स्थापितःकुंभे चतुर्बाहुश्चतुर्मुखः ॥३॥ वत्सजान्वाकृतिं वेद मुत्तराग्रैः कुशैः कृतम् ब्रह्मोपधाने दत्वा तं ततः स्वस्त्ययनं पठेत् ॥ ४ ॥ प्रतिष्ठां कारयेत्पश्चात्पूजाद्रव्यमथोच्यते। यज्ञोपवीत नैवेद्यं वस्त्रचन्दनकुंकुमैः ॥ ५ ॥ स्रग्धूपदीपताम्बूलैरेतैश्चापि पितामहम्। ब्रह्मजज्ञानमिति वा गायत्र्या वा प्रपूजयेत् ॥ ६ ॥ उपाध्यायं च संपूज्य, यथापाठस्तथा पठेत् ॥ ततो होमादि वक्ष्यमाणं कृत्वा पठेदित्यर्थः। तत्रैव बौधायनः।**

---

भाष्यार्थ.—आता पारायणविधि सांगतों.—पारायणाच्या आरंभीं कलशस्थापनइत्यादि विधि महार्णव ग्रंथांत सांगितला आहे, तो असा— तीर्थ, देवालय किंवा सडासमार्जनानें शुद्ध केलेलें घर इतक्या ठिकाणीं सुदृढ, घांसून स्वच्छ केलेला, पुष्पमाला, चंदन, केशर इत्यादींनीं सुशोभित (तांब्याचा) कलश वेदीच्या मध्यभागीं ठेवावा. त्यांत माती यव मिसळून टाकावी. नंतर ५० दर्भांचा ब्रह्मदेव करून तो कलशावर पश्चिमेकडे तोंड करून बसवावा. त्याच्या उत्तरेकडे उदगग्र य वत्सजान्वाकृतिोद ठावा. नंतर अग्न्युत्तारणपूर्वक प्राणप्रतिष्ठा करून वस्त्र, यज्ञोपवीत, चंदन, फुलें, माला, धूप, दीप, ताम्बूल वगैरे उपचारद्रव्यांनीं पूजा करावी. नंतर उपाध्यायब्राह्मणाची पूजा करावी. पुढें सांगण्यांत येणाऱ्या पद्धतीनें होमादि करून यथापाठ (ज्या शाखेचा जसा संप्रदाय असेल तसा) म्हणून पारायण करावें. त्याबद्दल बौधायन सांगतो —

भाष्य:—स्थंडिलं कल्पयित्वाग्निमुपसमाधाय, तं परिस्तीर्याज्ये-नैताभ्यो देवताभ्यो जुहोत्यग्नये सोमाय विश्वेभ्यो देवेभ्यो ब्रह्मणे ऋषिभ्य ऋग्भ्यो यजुर्भ्यः सामभ्य श्रद्धायै मेधायै प्रज्ञायै धारणायै श्रियै ह्रियै सावित्र्यै सवित्रे प्रजापतये काण्डऋषयेऽग्नयेकाण्ड-ऋषये विश्वेभ्यो देवेभ्य काण्डऋषिभ्यः संहिताभ्यो देवताभ्य उप-निषद्भ्यो याज्ञिकीभ्यो देवताभ्य उपनिषद्भ्यो वारुणीदेवताभ्य उपनिषद्भ्यो हव्यवाहाय विश्वेभ्यो देवेभ्यो वरुणेभ्यो ऽनुमत्यै स्विष्टकृते च पृथक् स्वाहाकारेण हुत्वा व्याहृतिभिश्च हुत्वा पुन परिषिंचति। समाप्ते चैता यजुषा तर्पयति। अन्ते एता ' अग्निमो-माद्या यजुषा पदेन सह तर्पयेत्। यद्वा ' भूर्देवाँस्तर्पयामि' इत्यादि यजुषा तर्पयित्वा अग्न्यादींस्तर्पयेदित्यर्थ ॥ महार्णवे ॥ एवं ऋग्वे-दस्य काण्डऋष्यादिवर्ज्यम् आस्विष्टकृतस्तेषा स्थाने शतर्चिभ्यो माध्यमेभ्यो गृत्समदाय विश्वामित्राय, वामदेवायात्रये भरद्वाजाय जमदग्नये गौतमाय वसिष्ठाय प्रागाथेभ्य पावमानीभ्य क्षुद्रसूक्तेभ्यो महानाम्नीभ्य इति। ततो वेदादिमारभ्य संततमधीयीत इत्याह बौधायन।

---

भाष्यार्थ — यथाविधि स्थंडिल करून अग्नीची स्थापना करावी. नंतर परिस्तरण घालून आज्याने अग्नि,सोम इत्यादि स्विष्टकृतापर्यंत ज्या देवता मूलग्रथात चतुर्थीविभक्ति लावून दिलेल्या आहेत त्या प्रत्येक मत्रास स्वाहा कार लावून हवन करावें नतर व्याहृतीचा होम करावा आणि पर्युक्षण करून होम समाप्त करावा नतर त्यान मत्रानीं ' यजुषा '' पदासह अग्न्यादिदेवतानें तर्पण करावें, किंवा यजुषा म्हणजे '' भूर्देवाँस्तर्पयामि '' इत्यादि मत्रानीं तर्पण करून अग्न्यादि देवतांचें तर्पण करावें तात्पर्य, वरील तर्पणापैकी एक प्रकार स्वीकारावा हा विधि भगवान् बौधा यनानीं सांगितला असून तेच त्यानीच ऋग्वेदीयासाठीं विशेष सांगितला तो असा—मागें सांगितलेल्या विधानात काण्डऋष्यादि ऋषये काण्डऋषये येथ

पासून रिफ्सूक्तापर्यंत ज्या देवता सांगितल्या आहेत त्या सोडून त्या ऐन्द्री ' शतर्चिभ्यो महानाम्नीभ्य ' येथपर्यंत दिलेल्या देवता ध्याव्या व होमविधि समाप्त करावा नंतर वेदाच्या आरंभापासून अखंड पारायण करावें

---

भाष्यः— पुनर्महार्णवे " अथातः पारायणविधिं व्याख्यास्यामः " आसमाप्तेर्नाश्नीयात् यथाशक्ति वाऽपः पयः फलान्योदनं वा हविष्यमात्रमन्नमल्पं भुक्त्वा तदाऽशेषमधीयीत ग्रामात्प्राच्यामुदीच्यां वा दिश्युपनिष्क्रम्याग्निमुपसमाधाय परिस्तीर्येध्मं प्रउवा द्याज्यनेताभ्यो देवताभ्यो जुहोत्यग्नये सोमायेन्द्राय प्रजापतये बृहस्पतये विश्वेभ्यो देवेभ्यो........धारणायै सदसस्पतयेऽनुमत्यै श्रियै ........प्रजापतये काण्डऋषये सोमाय काण्डऋषयेऽग्नये कांडऋषये विश्वेभ्यो देवेभ्यः काण्डऋषिभ्यः साहितीभ्यो देवताभ्य उपनिषद्भ्यो याज्ञीकीभ्यो०... महानाम्नीभ्यः इत्यन्तं प्राग्वत् । ततो वेदादिमारभ्य संततमधीयीत नास्याऽनध्यायो नास्यांतरा जननमरणे अशुचि· ( आशौचं नेत्यर्थः ) ' नान्तरा व्याहरेन्नविरमेद्यावन्त मधीयीत" । यावत्पर्यंन्तं पठेत् तावत्पर्यंन्तं न विरमेन्नान्यच्च वदेदित्यर्थः । "यद्यन्तरा विरमेत् त्रीन् प्राणानायम्य प्रणवं वा प्रविधाय यावत्कालमधीयीत । ततः सर्वनिशान्तरे संग्रामारण्यसलिलं लोप्य परिदध्यात् "निशान्तरं सन्ध्या निशादीन् लोप्य विहाय समापयेदित्यर्थः । आद्यन्ते च ब्राह्मणभोजनं दक्षिणां च दद्यात् ॥ इति महार्णवोक्तम् विधानम् ।

---

भाष्यार्थ — महार्णवग्रंथातील पुन पारायणविधि सांगतो असा आरंभ करून आरंभीं कांहीं नियम सांगितले आहेत ते असे पारायण समाप्तीपर्यंत भोजन करू नये. शक्तीप्रमाणें पाणी, दूध, फळें, भात किंवा थोडें केवळ हविष्यान्न खाऊन संपूर्ण अध्ययन करावें त्याकरितां गावाबाहेर पूर्वेस किंवा उत्तरेस जाऊन शुद्धस्थानीं मागें सांगितल्याप्रमाणें होमविधि

करिता स्थण्डिलादि कर्म करावें. इतनात मार्गे सांगितल्या देवतांपेक्षा काहीं अधिक देवता सांगितल्या आहेत त्या घ्याव्या. ऋग्वेद्यांनी होमात काहऋष्यादि देवता न घेता, त्यांच्या स्थानीं 'शतर्चिभ्य....महानाम्नीभ्यः' पर्यंतच्या देवता घेऊन होम समाप्त करावा त्यापुढचा विधि पूर्वोक्तच समजावा नंतर हरिः ॐ म्हणून वेदपारायण आरंभावें व सतत म्हणजे खण्ड न पडू देता दररोज अध्ययन करावें. नियम—पारायणामध्यें अनध्याय दिवस धरणें नाहीं जननाशौच व मृताशौच नाहीं. पारायणात विराम घेऊं नये व नीट नये. जर विराम किंवा भाषण होईल-तर तीन प्राणायाम करून प्रणवाचें उच्चारण करावें. ठरलेल्या काळापर्यंतच अध्ययन करावें. रात्रीं किंवा संध्यासमयीं व तसेंच युद्धकाल व अरण्योदक या ठिकाणीं पारायणाची समाप्ति करू नये आरंभीं व शेवटीं ब्राह्मणास भोजन घालून दक्षिणा द्यावी असें महार्णवग्रंथात विधान सांगितलें आहे

---

भाष्यः—अथ कमलाकरः– य एतेन विधिना वेदमधीयीत संततं पूतो भवति, मनःशुद्धिश्च भवति, वेदरूपो भवति इत्यर्थः। द्वाभ्यां पारायणाभ्यां ऋग्भिश्चाऽभोजन इहार्धीते ऽ नृतेभ्यः प्रमुच्यते। त्रिभिर्बहुभ्यः पतनीयपातकेभ्यः शूद्रायां रेतः सिक्त्वा गंगाप्लुष-निमज्यश्च भवति। चतुर्भिः शूद्रान्नभोजनात् स्त्रीसेवनाच्च, पञ्च-भिरयाज्ययाजनात् अग्राह्यग्रहणात्। षड्भिर्ब्राह्मणस्त्रीलोहितकरणात् पशुहननात् सुवर्णस्तेयात् पतितसंयोगाच्च। सप्तभिः प्राजापत्यस्य हीनचरणात् यज्ञोपवन्वनाच्चान्द्रायणस्यान्तराचरणात् गुरुतल्पगमनाद्रजस्वलागमनाच्च। नवभिः सुरापानाद्दशभिः पूर्वजन्मेहजन्मकृतैः सर्वैः पापैः प्रमुच्यते स्वर्गं लोकं गच्छति, इति अग्निहोमादिक्रतुभिरिष्टं भवति, पितॄन् स्वर्गं लोकं गमयति। वेदाध्यायी सदैव स्यादपापा सत्यवाक्शुचिः। यं यं कामं कामयते तं तं वेदेन साधयेत्॥ असाध्यं नास्ति यत् किंचिद्ब्रह्मणो हि फलं महत्॥

**भाष्यार्थ** —– कमलाकर म्हणतो, जो या पारायणविधीनें पारायण (वेदाध्ययन) सतत करतो तो पवित्र होऊन त्याची अन्तःशुद्धि होते तात्पर्य, तो वेदस्वरूप होतो भोजन न करता केलेल्या दोन पारायणांनीं, खोटें बोलण्याच्या पातकातून मुक्त होतो तीन पारायणाना पातित्य आगमान्या अनेक पातकापासून मुक्त होतो चार पारायणें केल्यानें अभोज्यभोजन व परस्त्रीसेवन इत्यादि पातकें नाश पावतात पाच पारायणाना अयाज्ययाजनअग्राह्य ग्रहण इत्यादि पातकें नाश पावतात सहा पारायणानीं मातागस्त्रीगमन, पशुहत्या, सुवर्णचोरी व पतितसंसर्ग इत्यादि पातकें नष्ट होतात सात पारायणें केल्याने, प्राजापत्यकृच्छ्र करीत असता आलेली न्यूनता व यज्ञात पशु बाधणें इत्यादि पातकें नाश पावतात आठ पारायणानीं चांद्रायणकृच्छ्रात घडलेल्या पातकें नष्ट होतात नऊ पारायणाना मद्यपानाचें पातक नाश पावतें दहा पारायणें केल्यानें पूर्वजन्मात व या जन्मात घडलेलीं सर्व पातकें नाश पावतात व पारायण करणारा स्वर्गलोकात जातो व अग्निष्टोमयज्ञाच फळ मिळवता पितराना स्वर्गास पाठविता तात्पर्य, वेदाध्ययन करणारा पापरहित, सत्यवचनी व शुद्ध राहून, जें जें इच्छितो तें तें त्यास वेदाच्या अध्ययनान मिळतें वेदाध्ययनाचें फळ फार मोठें आहे त्यास असाध्य कोणतीच गोष्ट राहत नाहीं

---

**भाष्यः**— ऋग्विधाने-आदावेव तु सावित्र्या कर्म कुर्वीत शान्तये। पुष्टये पशुलाभाय, धनलाभाय भूतये॥ १॥ एषा हि संहिता देवै सर्वब्रह्ममयी निवृत्। उग्रेण तपसा दृष्टा विश्वामित्रेण धीमता ॥ २॥ होमाश्च जपयज्ञाश्च नित्यं कुर्वीत वै तया। सर्वकामप्रसिद्ध्यर्थं परं ब्रह्मेदमुच्यते ॥ ३॥ एषा वै प्रतिलोमोक्ता शत्रुपक्षविनाशिनी। अक्षरप्रातिलोम्येयमभिचारेषु शस्यते ॥ ४॥ सर्वसंहितया प्रत्यृच होम आज्येन तिलेन वा। 'आज्यं द्रव्यमनादेशे जुहोतिषु विधीयते' इति ब्राह्मोक्ते। सर्वपापहरो होम-

स्तिलै: सर्वत्र शस्यते । इति विष्णुधर्मोत्तराच्च । शातातपः- कृच्छ्रो देव्ययुतं चैव वेदपारायणं तथा । तिलहोमसहस्रं च सममेत-च्चतुष्टयम् । इदं केवलम् । अन्ये चान्द्रमसम् । इति कमलाकरभट्टकृतः वेदपारायणविधि: समाप्तः। व्याख्या चरणव्यूहस्य आद्यखण्डस्य वै मया । यथामति विरचिता महादेवप्रसादतः ॥ १॥ इति चरणव्यूह-भाष्ये प्रथमखण्डः समाप्त ॥ इति प्रथमः ऋग्वेदखण्डः समाप्तः ॥

---

भाष्यार्थ— ऋग्विधानात असें म्हटलें आहे कीं, ही गायत्रीरूप महिता देवांनीं निर्माण केली आहे. म्हणून शांति, पुष्टि, पशु, धनलाभ व उत्कर्ष याकरितां पारायण करणें झाल्यास प्रथम गायत्रीनें कर्म ( गायत्रीजप ) करावें ही बुद्धिमान् अशा विश्वामित्रऋषीनें घोर तप करून मिळविली आहे, म्हणून सर्व मनोरथपूर्तीकरिता ह्या गायत्रीमंत्राचें हवन व जप नित्य करावा. ही गायत्री विपरीत अक्षरांनीं म्हणून जप केला असता शत्रुपक्षाचा नाश होतो. अभिचार म्हणजे जारणमारण व उच्चाटन या कर्मांत ही गायत्री अक्षरांच्या व्युत्क्रमानें म्हणणें अवश्य आहे. ब्रह्मपुराणांत असें सांगितलें आहे कीं, हवनांत द्रव्य सांगितलें नसल्यास, आज्य घ्यावें म्हणजे केवळ आज्यानें हवन करावें. सर्व ठिकाणीं तिलद्रव्याचा होम प्रशस्त आहे. कारण तो सर्वपापनाशक होय असें विष्णुधर्मोत्तरपुराणांत वचन आहे शातातपऋषि म्हणतो, कृच्छ्र, अयुत १०००० गायत्रीजप, वेदपारायण व सहस्रसंख्याक तिलहोम या चार गोष्टी समसमान आहेत. म्हणजे या प्रत्येक क्रियेचें फळ पापनाश हें आहे. उपर्युक्त शातातपाचे वचनांत जो कृच्छ्रशब्द आहे तो प्राजापत्यकृच्छ्र या अर्थीच आहे. इतर ग्रंथकार त्याचा अर्थ-चान्द्रायणकृच्छ्र असा करतात. याप्रमाणें कमलाकरभट्टकृत वेदपारायणविधि समाप्त झाला याप्रमाणें चरणव्यूहाच्या प्रथमखंडाचें भाष्य यथामति विश्वेश्वराच्या कृपेनें समाप्त झालें. येथें चरणव्यूह प्रथमखण्डभाष्यभाषांतर समाप्त.

# ( चरणव्यूहद्वितीयखण्डः )

॥ यजुर्वेदवर्णनम् ॥

## ॥ अथ यजुर्वेदखण्डः ॥

यजुर्वेदस्य षडशीतिर्भेदा भवन्ति । तत्र चरकानाम् द्वादश भेदा भवन्ति, चरका आह्वरकाः कठाः प्राच्यकठाः कपिष्ठलकठाश्चारायणीया वारायणीया वार्तान्तवेया श्वेताश्वतरा औपमन्यवः पाताण्डनीया मैत्रायणीयाश्चेति । तत्र मैत्रायणीयानाम् षड्भेदा भवन्ति, मानवा वाराहा दुन्दुभाश्छागलेया हारिद्रवेया श्यामायनीयाश्चेति । तेषां अध्ययनम्—

द्वे सहस्रे शते न्यूने मन्त्रे वाजसनेयके ।
ऋग्गणः परिसङ्ख्यातस्ततो ऽन्यानि यजूंषि च ।

अष्टौ शतानि सहस्राणि चाष्टाविंशतिरन्यान्यधिकश्च पादमेतत्प्रमाणं यजुषां हि केवलम् सवालखिल्यं सशुक्रियं ब्राह्मणं च चतुर्गुणम् । तत्र तैत्तिरीयकाणां द्विभेदा भवन्त्यौखेयाः खाण्डिकेयाश्चेति । तत्र खाण्डिकेयानां पञ्चभेदा भवन्ति । कालेता शाट्यायनी हैरण्यकेशी भारद्वाज्यापस्तम्बी चेति । तेषामध्ययनमष्टाशतयजुः सहस्रान्यधीत्य शाखापारो भवति, तान्येव द्विगुणान्यधीत्य पद-

पारो भवति, तान्येव त्रिगुणान्यधीत्य क्रमपारो भवति, षडङ्गान्यधीत्य षडङ्गविद्भवति ।

त्रिगुणं पठ्यते यत्र मन्त्रब्राह्मणयोः सह ।
यजुर्वेदः स विज्ञेयः शेषाः शाखान्तराः स्मृताः ॥

शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्योतिषमिति षडङ्गानि ।

छन्दः पादौ तु वेदस्य हस्तौ कल्पोऽथ पठ्यते ।
ज्योतिषामयनं चक्षुर्निरुक्तं श्रोत्रमुच्यते ॥
शिक्षा घ्राणं तु वेदस्य मुखं व्याकरणं स्मृतम् ।
तस्मात्साङ्गमधीत्यैव ब्रह्मलोके महीयते ॥

तथा प्रतिपदमनुपदं छन्दो भाषाधर्मो मीमांसान्यायस्तर्क इत्युपाङ्गानि । तत्र परिशिष्टानि भवन्ति, उपज्योतिषं साङ्गलक्षणं यूपलक्षणं, छागलक्षणं प्रतिज्ञाऽनुवाकसङ्ख्याचरणव्यूहश्राद्धकल्पशुल्बकानि पार्षदमृग्यजूंषीष्टकापूरणं प्रवराध्यायोक्थशास्त्रक्रतुसङ्ख्या निगमा यज्ञपार्श्वहौत्रकं प्रसवोत्थानं कूर्मलक्षणमित्यष्टादश परिशिष्टानि भवन्ति । तत्र कठानां योगा येन विशेष स्तत्र प्राच्योदीच्यनैर्ऋत्यवाजसनेयानां पञ्चदश भेदा भवन्ति जाबाला बौद्धायनाः काण्वा माध्यन्दिनेयाः शाफेयास्तापनीया कपोलाः पौण्डरवत्सा आवटिकाः परमावटिकाः पाराशरा वैणेया वैधेया अद्धा बौधेयाश्चेति । तेषामध्ययनं सौत्रिकं प्रवचनीयश्चेति ।

मन्त्रब्राह्मणकल्पानामङ्गानां यजुषामृचाम् ।
षण्णां यः प्रविभागज्ञः सोऽध्वर्युः कृत्स्नमुच्यते ॥ १ ॥

भाष्यम्:— अथ द्वितीयखण्ड व्याख्यायते— यजुर्वेदस्य षडशीतिर्भेदा भवन्ति अत्र शाखाभेदो ग्राह्यः। षड् अशीतिर्भेदा इत्यर्थः। तत्र चरकाना द्वादश भेदा भवन्तीति स्पष्टार्थं। ते के भेदा।

चरकाः आन्हरकाः कठाः प्राच्यकठाः कपिष्ठलकठाः आरायणीया वारायणीया वार्तान्तवेयाः श्वेताश्वतरा औपमन्यवः पाताण्डनीया मैत्रायणीयाश्चेति। तत्र मैत्रायणीयानां षड्भेदा भवन्ति। मानवा दुंदुभा वाराहका छागलेया हारिद्रवेया (श्यामा) श्यामायनीयाश्चेति।

इति षट् मैत्रायणीयशाखागणा इत्यर्थं। मैत्रायणीयानां केचित् सप्तभेदा भवन्ति इति वदन्ति। 'श्यामा' इत्यधिकं तदधिकमेव। मैत्रायणीयस्तु वाजसनेयवेदाध्यायी। मानवं कल्पसूत्रम्।

तेषामध्ययनमष्टोत्तरशत यजु. सहस्राण्यधीत्य शाखापारो भवति। तेषामध्ययने द्विचत्वारिंशत् अध्यायाः। अष्टशताधिकसहस्त्रमन्त्रा इत्यर्थ। तान्येव द्विगुणान्यधीत्य पदपारो भवति। द्विवारपठनात् पदपारायणफलम् भवतीत्यर्थ। तान्येव त्रिगुणान्यधीत्य क्रमपारो भवति। त्रिवारपठनात् क्रमपारायणफलं भवतीत्यर्थ.। पदक्रमाध्ययनं पृथक् न भवतीत्यर्थः।

---

भाष्यार्थ -- यजुर्वेदाचे ८६ भेद आहेत भेद या शब्दानें शाखाभेद हा अर्थ घ्यावा त्यात चरकाचे १२ भेद–त्याची नावें १ चरक, २ आह्वरक, ३ कठ, ४ प्राच्यकठ, ५ कपिष्ठलकठ, ६ आरायणीय, ७ वारायणीय, ८वार्तान्तवेय, ९ श्वेताश्वतर, १० औपमन्यव, ११ पाताण्डनीय, १२ मैत्रायणीय मैत्रायणीयशाखेचे भेद ६ १मानव, २ दुदुभ, ३ हारिद्रवेय, ४वाराह, ५ छागलेय (एनेय) व ६ श्यामायनीय असे हे मैत्रायणीय शाखागण (भेद) आहेत.

रित्येक मैत्रायणीय शाखेचे सात भेद मानतात. त्यांच्या मतें 'श्यामा' हा आधिक आहे, पण तो खरोखर अधिकच आहे. मैत्रायणीय शाखेचा मनुष्य वाजसनेय वेदाचें अध्ययन करणाराच असतो. मानव हें त्याचें वस्त्रसूत्र म्हणजे श्रौतसूत्र होय. त्याचे संहितांतर्गताचे मन्त्र ११०८ आहेत त्याचे ४१ अध्याय केले आहेत संहितामंत्राचें दोन वेळ पठन केलें म्हणजे तो वैदिक 'पदपार' या संज्ञेस योग्य होतो तीन वेळ पठनानें त्याला 'क्रम-पार" ही संज्ञा मिळते तात्पर्य, या शाखेस अनुक्रमें पद व क्रमपारायण केल्याचें फल मिळतें कारण त्यांना (मैत्रायणीयांना) पदक्रमाध्ययन साहतेहून वेगळें नाहीं

---

भाष्यः—षडंगान्यधीत्य षडंगविद् भवति। ता शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्योतिषमित्यंगानि भवन्ति।

प्राच्य-उदीच्यनैर्ऋत्येषु तिसृषु दिक्षु वाजसनेय-वेदोत्पत्तिरग्रे वक्ष्यामः। इतर देशेषु वेदशाखयोर्विभाग उच्यते। तच्च-विवाहे सोमे श्राद्धे च अग्न्याधाने तथैव च। एते. स्वजातिभिः कुर्यादन्यथा पतितो भवेत्। महार्णवे-पृथिव्या मध्यरेखा च नर्मदा परिकीर्तिता। दक्षिणोत्तरयोर्भागे शाखावेदाश्च उच्यते॥ ॥१॥ नर्मदा दक्षिणे भागे आपस्तम्ब्याश्वलायनी। राणायनी पिप्पला च यज्ञकन्याविभागिनः॥२॥ माध्यंदिनी सांख्यायनी, कौथुमी शौनकी तथा। नर्मदोत्तरभागे च, यज्ञकन्याविभागिनः॥३॥ तुंगा कृष्णा तथा गोदा सह्याद्रिशिखरावधि। आ आन्ध्रदेशपर्यन्त, बह्वृचश्चाश्वलायनी॥४॥ उत्तरे गुर्जरे देशे वेदो बह्वृच ईरितः। कौषीतकी ब्राह्मण च शाखा सांख्यायनी स्थिता॥५॥ आन्ध्रादि-दक्षिणाग्नेयी गोदा सागर आवधि। यजुर्वेदस्तैत्तिरीय आपस्तंबी प्रतिष्ठिता॥६॥ अन्यर्यूद्राद्धहोतॄणां सन्ति सूत्राण्यनेकशः। यत्रास्ति योनिसंबंधः सूत्रज्ञानफलान्वितः॥७॥ सह्याद्रिपर्वतारंभा-

दिशां नैर्ऋत्यसागरात् । हिरण्यकेशी शाखा च पर्शुरामस्य सन्निधौ ॥
॥८॥ मयूरपर्वताच्चैव यावद्गुर्जर देशत । व्याप्ता वायव्यदेशात्तु
मैत्रायणी प्रतिष्ठिता ॥ ९ ॥ अंगवंगकलिंगाश्च कानीनो गुर्जरस्तथा ।
वाजसनेयी शाखा च माध्यंदिनी प्रतिष्ठिता ॥ १० ॥ ऋषिणा याज्ञ
वल्क्येन सर्वदेशेषु विश्रुता । वाजसनेयवेदस्य प्रथमा काण्व-
संज्ञका ॥ ११ ॥

---

भाष्यार्थ — सहा अंगानें अध्ययन करून, वैदिक षडंगवक्ता होतो तीं षडंगें कोणतीं ? शिक्षा, ज्योतिष छंद, व्याकरण, ( अष्टाध्यायी ) कल्प, ( श्रौत व गृह्यसूत्र ) व निरुक्त अशीं सहा आहेत. पूर्व, उत्तर व नर्मदा या दरीत, वाजसनेय शाखेचे लोक आहेत व त्याचे भेद १५ आहेत पूर्वोक्त तीन दिशात, वाजसनेय वेदाची उत्पत्ति कशी झाली ही गोष्ट पुढ सांगण्यात येईल येथ व इतर देशात कोणत्या वेदाची कोणती शाखा आहे, कीं जिचा परस्पर यज्ञकन्यासंबंध आहे याचा विभाग सांगतों. विवाह, सोमयज्ञ, श्राद्ध व अग्न्याधान या कर्मांत त्या वाजसनेयांनीं स्वजातीशीं संबंध करावा नाहीं तर तो पतित होतो, असें वचन आहे शिवाय महार्णव ग्रंथात पुढील वचन आलेलें आहेत 'भारतवर्ष' या सज्ञेनें प्रसिद्ध असलेल्या भूभागातून मध्यभागीं नर्मदा नदी वहात असल्यामुळें तिला 'पृथ्वीची मध्यरेषा' म्हटलें असावें मध्यरेषेच्या दक्षिणोत्तर भागात चार वेदाच्या कोणकोणत्या शाखा अस्तित्वात आहेत, कीं ज्यांचा परस्पर संबंध विवाहादि कर्मांत होतो, तें सांगतों मध्यरेषेच्या म्हणजे नर्मदेच्या दक्षिणेस यजुर्वेदाची आपस्तंबी ऋग्वेदाची आश्वलायनी, सामवेदाची राणायनी व अथर्ववेदाची पिप्पला या चार शाखा असून, त्या शाखांचें अध्ययन करणारांत परस्पर यज्ञविवाहसंबंध होतो. नर्मदेच्या उत्तरेस माध्यंदिनी, शांख्यायनी, कौथुमी व शौनकी ह्या चार शाखा अनुक्रम यजुर्वेद, ऋग्वेद, सामवेद व अथर्ववेद याच्या असून त्यांचाही परस्पर संबंध ( यज्ञ,

विराट ( कर्नाटक ) आहे. सह्याद्रिशिखरापासून कृष्णा, तुंगभद्रा व गोदावरी यांचे तीरीं आंध्र देशापर्यंत ( तैलंगण ) शाकल व आश्वलायन या दोन शाखा आहेत. नर्मदेच्या उत्तरेस गुजर देशात ऋग्वेदच आहे. त्याची तिरड सांख्यायनी शाखा व कौषीतकी ब्राह्मण आहे. आंध्रापासून दक्षिण देशात आग्नेयीकडे असलेल्या देशात गोदासागरापर्यंत यजुर्वेदाचा तैत्तिरीय व आपस्तंबी शाखा आहे. अध्वर्यु, उद्गाता व होता यांचीं कर्में जाणणारी मूर्ती आहेत. जेथे त्याचा परस्पर विवाह व यज्ञसंबंध होतो तेथें त्या सूत्राचें ज्ञान सफल आहे. सह्याद्रीपासून नैर्ऋत्येस असलेल्या समुद्रापर्यंत परशुराम क्षेत्राचे संनिध हिरण्यकेशी शाखा आहे. मयूरपर्वतापासून गुजराथच्या सर हद्दीपावेतों मैत्रायणी शाखा असून वायव्यसरहद्दीपर्यंत तिचा प्रसार आहे. अंग ( बिहार ) वंग ( बंगाल ) कलिंग ( ओरिसा ) कानीन (गौड) व गुजराथ देशात वाजसनेय वेदाची माध्यंदिनी शाखा आहे. याज्ञवल्क्यानें शुक्ल यजुर्वेदाची जी प्रथम कण्वशाखा तिचा सर्व देशात प्रसार केला.

---

भाष्यम्:— व्यासशिष्यो वैशम्पायनो निगदाख्य यजुर्वेद पठित्वा शिष्याश्चकार तद्य भागवते । वैशम्पायनशिष्या वै चरकाध्वर्यवोऽभवन् । यच्चेरुर्ब्रह्महत्यांहःक्षपणं स्वगुरोर्व्रतम् ॥ १ ॥ याज्ञवल्क्यश्च तच्छिष्य आहाहो भगवन् कियत् । चरितेनाल्पसाराणां चरिष्येऽहं सुदुश्चरम् ॥ २ ॥ इत्युक्तो गुरुरप्याह कुपितो याह्यलं त्वया । विप्रावमन्त्रा शिष्येण मदधीतं त्यजाश्विति ॥ ३ ॥ देवरात सुतस्सोऽपि च्छर्दित्वा यजुषां गणम् । ततो गतोऽथ मुनयो ददृशुस्तान् यजुर्गणान् ॥ ४ ॥ यजूंषि तित्तिरा भूत्वा तल्लोलुपतयाददुः । तैत्तिरीया इति यजुः शाखा आसन् सुपेशलाः ॥ ५ ॥ याज्ञवल्क्यस्ततो ब्रह्मंश्छन्दांस्यधिगवेषयन् । गुरोरविद्यमानानि सूपतस्थेऽर्कमीश्वरम् ॥ ६ ॥ याज्ञवल्क्य उवाच- 'ॐ नमो भगवते आदित्याय' इत्यारभ्य... .. 'अयातयामयजुःकाम उपसरामि' इत्यन्तं तुष्टाव । एवं स्तुतः स भगवान् वाजिरूपधरो हरिः । यजु-

प्ययातयामानि मुनयेऽदात्प्रसादितः ॥७॥ यजुर्भिरकरोच्छाखा दश पञ्चचतैर्विभुः । जगृहुर्वाजसन्यस्ताः काण्वमाध्यंदिनादयः ।

भाष्यार्थः— आता प्रसंगवशात् शुक्लयजुर्वेद कसा उत्पन्न झाला तें सांगतों. व्यासशिष्य वैशंपायनानें निगदाख्य यजुर्वेदाचें अध्ययन करून शिष्य केले. यानें वर्णन पुढीलप्रमाणे श्रीमद्‌भागवतांत आहे. वैशंपायनाचे ' चरकाध्वर्यु ' शिष्य होते. त्यानीं गुरुची ब्रह्महत्या नष्ट करणारें व्रत केलें तेव्हां वैशंपायनाचा शिष्य याज्ञवल्क्य गर्वानें पुढें येऊन म्हणाला, ' गुरुजी, हे शिष्य दुबळे आहेत. त्यांच्या व्रताचरणानें काय होणार ? यास्तव तुम्हीं सांगितलेलें हें कठीण व्रत मीच करतों.' ही त्याची गर्वोक्ति ऐकून वैशंपायनास राग आला व तो म्हणाला, ' पुरे तुझा संबंध. तूं येथून चालता हो. माझा शिष्य असून ब्राह्मणाचा अपमान केलास त्या अर्थी माझ्यापाशीं जें शिकलास तें सर्व टाकून दे ! ' याज्ञवल्क्य देवरातमुनीचा पुत्र होता. त्यानें गुरूच्या आज्ञेनुसार तत्काल यजुःसंहिता ओकून टाकली व तो तेथून निघून गेला. तो गेल्यावर ऋषींनीं यजुःसंहितेचीं टाकून दिलेलीं सर्व वचनें पाहिलीं. त्याच्याविषयीं ऋषींस लोभ वाटला. त्यानीं तित्तिरी पक्ष्याचीं रूपें घेऊन तीं घेतलीं. त्यामुळें त्या सुंदर तैत्तिरीय शाखा झाल्या. शौनकमुने, याज्ञवल्क्य तेथून गेल्यावर वेदमंत्रांचा शोध करूं लागला. त्याला आपल्या गुरूजवळ नसलेले असे नवीन वेदमंत्र पाहिजे होते. त्यासाठीं त्यानें सूर्याची उपासना केली. याज्ञवल्क्यानें 'हे भगवन् सूर्यनारायणा, तुला नमस्कार असो' अशा आरंभ करून पुष्कळ स्तुति केली व शेवटीं म्हणाला, ' मी तुझ्या चरणाला शरण आहें. करितां कोणाच्याही तोंडीं राहून शिळे झाले नाहींत असे नवीन यजुर्मंत्र मला पाहिजेत. ' सूत म्हणाले शौनका, याप्रमाणें याज्ञवल्क्यानें सूर्याचा स्तव केला असतां तो प्रसन्न झाला व त्यानें वाजीचें म्हणजे घोड्याचें रूपानें त्या ऋषीला नवीन असे यजुर्मंत्र दिले. त्या समर्थ याज्ञ-

वल्क्याला जे यजुर्मंत्र मिळाले त्याच्या त्याने (१५) पंधरा शाखा केल्या. त्या शाखाना वाजसनेयी शाखा म्हणतात त्याचा काण्व, माध्यंदिन इत्यादि कांनी स्वीकार केला.

---

भाष्यम्— इत्यादि-ग्रंथपर्यालोचनया यजुर्वेदत्यागानंतरं देवरातसुतेन अब्राह्मणत्वभिया स्तुतेन सूर्येण वाजिरूपेण वाजेभ्यः केसरेभ्यो वाजेन वेगेन वा सन्यस्तास्त्यक्ताः शाखा वाजसनेयी संज्ञाः। शाखारण्डत्वपरिहारार्थं चातुर्वेद्यत्वसंख्यासंरक्षणार्थं च वाजिरूपेण सूर्येणायातयामानि यजूंषि मुनये दत्तानि। तैर्यजुर्भिरुपेतैः समुनिस्ताः वाजसनाः पञ्चदशशाखा अकरोत्। तस्माच्च मुनेः सकाशात् काण्वमाध्यंदिनादयः अध्ययनं चक्रुः। ते पञ्चदश भवन्ति।

---

भाष्यार्थः— वरील ग्रंथाचा विचार करता यजुर्वेद टाकल्यानंतर देवरातपुत्र याज्ञवल्क्याने आपणास अब्राह्मणत्व येईल या भीतीने सूर्याचे स्तवन केले. तेव्हा घोड्याच्या रूपाने 'वाजेभ्य' म्ह. मानेवरच्या केशापासून वाजेन म्हणजे वेगाने टाकल्या म्हणून त्या शाखाना वाजसनेयी शाखा हे नाव प्राप्त झाले. शाखारण्डत्वदोष टाळण्याच्या निमित्ताने व वेदांची चार ही सख्या सरक्षण व्हावी म्हणून वाजीरूप सूर्याने वर्षां कोणास टाऊक नसलेले म्हणूनच नवीन (अयातयाम) असे यजुर्मंत्र याज्ञवल्क्यमुनीला दिले. त्या मिळालेल्या मत्रानी त्याने पधरा वाजसनेयी शाखा केल्यानतर काण्व, माध्यंदिन इत्यादींनी अध्ययन केले, त्या शाखा पधरा आहेत.

---

भाष्यम्:— अथ प्रसंगाद्यजुर्वेदस्य शाखाप्रणयनविचारः किंचिदुच्यते। तत्र यजुर्वेद एव प्रथमः। तथा च विष्णुपुराणे। एक एव यजुर्वेदस्तं चतुर्धा व्यकल्पयत् इति। यज्ञोपयोगित्वरूपयोगात् सर्वोऽपि वेदो यजुर्वेद इत्युच्यते। यजुर्वेदस्य

शाखाभेदं सविस्तरमाह — यजुर्वेदतरो शाखा सप्तविंशान् महा मुने। वैशंपायननामासौ व्यासशिष्यश्चकार वै ॥ १ ॥ शिष्येभ्य प्रददौ ताश्च जगृहुस्तेऽप्यनुक्रमात्। याज्ञवल्क्यस्तु तस्याभूद्‌ब्रह्म रातसुतो द्विज ॥ २ ॥ शिष्य परमधर्मज्ञो गुरुवृत्तिरत सदा। ऋषियोऽद्य महामेरो समाजे नागमिष्यति ॥ ३ ॥ तस्य वै सप्तरा त्रात्तु ब्रह्महत्या भविष्यति। पूर्वमेव मुनिगणे समयो य कृतो द्विज ॥ ४ ॥ वैशंपायन एकस्तु त व्यतिक्रान्तवास्तदा। स्वस्रीय बालकं सोऽथ पदाघृष्टमघातयत् ॥ ५ ॥ शिष्यानाह स भो शिष्या ब्रह्महत्यापहं व्रतम्। चरध्व मत्कृते सर्व न विचार्यमिद तथा ॥ ६ ॥ अथाह याज्ञवल्क्यस्तु किमेतैर्बहुभिर्द्विजै। क्लेशितैरल्पतेजोभिश्च रिष्येऽहमिदं व्रतम् ॥ ७ ॥

---

भाष्यार्थ — आता प्रसगानें यजुर्वेदशाखेच्या रचनेचा थोडा विचार सांगतों प्रथम यजुर्वेदच होता विष्णुपुराणांत एकच यजुर्वेद चार प्रकारानीं कल्पिला असें म्हटलें आहे कारण सर्व वेद यज्ञोपयोगी असल्या मुळें त्याना यजुर्वेद हा संज्ञा होती आता यजुर्वेदाचा शाखाभेद सविस्तर सांगतों व्यासशिष्य वैशंपायनानें यजुर्वेदवृक्षाच्या २७ शाखा कल्पया आणि शिष्याना दिल्या त्यानीं अनुक्रमानें त्या ग्रहण केल्या वैशंपायनशिष्य याज्ञवल्क्य ब्रह्मरातपुत्र असून परम धर्म जाणणारा व गुरुसेवेत तत्पर असा होता एके वेळीं सर्व ऋषींनीं विचार करून असें ठरविलें का, मेरुपर्वतावर आपला मोठा समाज भरवावा त्या वळीं ठरल्याप्रमाणें त्या समाजात जो ऋषि येणार नाहीं त्याला सात दिवसातच ब्रह्महत्या घडेल या नियमाचें एकट्या वैशंपायनानें उल्लंघन केलें त हा कमनसंयोगानें सात दिवसाचे आतच त्याचा भाचा त्याच्याच पायानें चिरडून मेला व त्यामुळें त्यास ब्रह्महत्या लागली म्हणून त्यान आपल्या सर्व शिष्याना ब्रह्महत्यानाशक व्रत करण्याची आज्ञा केली तेव्हा याज्ञवल्क्य पुढें येऊन म्हणाला, ' या निस्तेज ब्राह्मणाना व्यर्थ कष्ट देण्यात काय अर्थ ? मी हें व्रत करतों

भाष्यः— ततः क्रुद्धो गुरुः प्राह याज्ञवल्क्यम् महामुनिम्। मुच्यतां यत्त्वयाधीतं मत्तो विप्रावमानक ॥८॥ निस्तेजसो वदस्येनान् यत्त्वं ब्राह्मणपुंगवान्। तेन शिष्येण नार्थोऽस्ति ममाज्ञाभंगकारिणा ॥९॥ याज्ञवल्क्यस्ततः प्राह भक्त्यैतत्ते मयोदितम्॥ ममाप्यलं त्वयाधीतं यन्मया तदिदं द्विज ॥१०॥ पराशर उवाच। इत्युक्तो रुधिराक्तानि सरूपाणि यजूंषि सः। छर्दयित्वा ददौ तस्मै ययौ च स्वेच्छया मुनिः ॥११॥ यजूंष्यथ विसृष्टानि याज्ञवल्क्येन वै द्विज। जगृहुस्तित्तिरा भूत्वा तैत्तिरीयास्तु ततः स्मृताः ॥१२॥ ब्रह्महत्याव्रतं चीर्णं गुरुणा चोदितैस्तु यैः। चरकाध्वर्यवस्ते तु चरणान्मुनिसत्तम ॥१३॥ याज्ञवल्क्योऽपि मैत्रेय प्राणायामपरायणः। तुष्टाव प्रयतः सूर्यं यजूंष्यभिलषंस्ततः ॥१४॥

---

भावार्थ.—'गुरु रागावून म्हणाले, 'तू ब्राह्मणाचा अपमान करणारा आहेस. कारण या श्रेष्ठ ब्राह्मणांना तू निस्तेज म्हणतोस तर माझा आज्ञाभंग करणाऱ्या शिष्याचा काय उपयोग? तेव्हा माझ्यापासून केलेलें अध्ययन टाकून दे!' तेव्हा याज्ञवल्क्य म्हणाला, 'गुरो, मी तुमच्या ठिकाणीं असलेल्या भक्तीनें असें म्हणालों. असें असता तुम्ही रागावला तर तुमच्यापासून केलेलें अध्ययन मलाही नको.' पराशर म्हणाले, असें बोलून त्यानें रक्तानें भरलेले असे मूर्तिमन्त यजुर्मन्त्र ओकून टाकले व तो निघून गेला. याज्ञवल्क्यानें ओकून टाकलेले ते यजुर्मन्त्र घेतांना ब्राह्मणरूपानें घेणें अनुचित वाटलें म्हणून त्यांना तित्तिरीपक्ष्यांच्या रूपानें पुन घेतले म्हणून ते तैत्तिरीय झाले. वैशंपायनानें सांगितलेल्या (याज्ञवल्क्यव्यतिरिक्त) ज्या शिष्यांनी ब्रह्महत्यानाशाकरितां आचरण केलें ते 'चरकाध्वर्यु' झाले. हे मैत्रेया, नंतर याज्ञवल्क्यानेंही प्राणायामतत्पर होऊन शुद्ध रीतीनें यजुर्मंत्र (वैशंपायनगुरूजवळ नसलेले) संपादन करण्याच्या इच्छेनें सूर्याची स्तुति केली.

